**राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरणांतर्गत १०- कंत्राटी सेवा व १७- संगणक खर्च या बाबींकरीता एकूण रुपये १७.०० लाख इतका निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- अर्थसं -१११९/ प्र.क्र.१३२/१३-स**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- ०४ मार्च, २०२०

**वाचा :- १.**राज्य सहकारी निवडणुक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे, क्रमांक:- जा.क्र. रासनिप्रा / निवडणुक/ लेखा/ कक्ष-१५/ हिवाळीपुरवणी मागणी /७९६९/२०१९, यांचे दिनांक १४.११.२०१९ रोजीचे पत्र.

२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक :- संकीर्ण-२०१९/ प्र.क्र.२२/कोषा प्रशा४, दिनांक - २९ जानेवारी, २०२० रोजीचे परिपत्रक.

**प्रस्तावना :-**

राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे वाचा १ येथील प्रस्तावाच्या अनुषंगाने प्राधिकरणाच्या आस्थापनेवर कार्यरत अधिकारी व कर्मचारी यांचे नियमित मानधन, परिश्रमिक व एजन्सीची देयके अदा करण्यासाठी प्राधिकरणास हिवाळी अधिवेशन डिसेंबर, २०१९ च्या पुरवणी मागणीच्या अनुषंगाने कंत्राटी सेवा नवीन निर्माण झालेल्या बाबी साठी रुपये ८,५५,१६२/-, कार्यालयीन खर्च या बाबीसाठी रुपये १,९०,०००/- व संगणक खर्च या बाबीसाठी रुपये २६,७८,८२६/- असे सर्व मिळून रुपये ३७,२३,९८८/- इतक्या रकमेचा प्रस्ताव विधानमंडळास सादर करण्यात आला होता. त्यापैकी, पुरक मागणीद्वारे मंजूर मागणी क्र.व्ही-२, २०७० इतर प्रशासनीक सेवा (००) (८००)- इतर खर्च (००)(०१) राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण (अनिवार्य) (२०७० ०८८२) १०- कंत्राटी सेवा करिता रूपये ८.५५ लाख व १७- संगणक खर्च करिता रूपये ८.४५ लाख असे एकूण रुपये १७.०० लाख इतका निधी मंजूर करण्यात आलेला आहे. पुरवणी मागणीद्वारे मंजूर निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे कार्यालयासाठी डिसेंबर, २०१९ च्या हिवाळी अधिवेशनात पुरक मागणीद्वारे मंजूर मागणी क्र.व्ही-२, २०७० इतर प्रशासनीक सेवा (००) (८००)- इतर खर्च (००)(०१) राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण (अनिवार्य) (२०७० ०८८२) १०- कंत्राटी सेवा करिता रूपये ८.५५ लाख व १७- संगणक खर्च करिता रूपये ८.४५ लाख असे एकूण रुपये १७.०० लाख इतक्या निधीची पुरवणी मागणी मंजूर झाली आहे.

२. उपरोक्त मंजूर पुरवणी मागणीचा तपशील विचारात घेता १०- कंत्राटी सेवा याकरिता रुपये ८.५५ लाख (अक्षरी रूपये आठ लाख पंचावन्न हजार) तर, १७- संगणक खर्च याकरिता रूपये ८.४५ लाख (अक्षरी रुपये आठ लाख पंचेचाळीस हजार) असे एकूण रुपये १७.०० लाख (अक्षरी रूपये सतरा लाख) इतका निधी वितरणास या शासन निर्णयान्वये मान्यता दर्शविण्यात येत आहे.

**३.** १०- कंत्राटी सेवा अंतर्गत निधी वितरणासाठी वित्त विभागाच्या दिनांक २९.०१.२०२० रोजीच्या शासन परिपत्रकान्वये कंत्राटी सेवेतील कर्मचाऱ्यांचे परिश्रमिक / मानधनाचा खर्च १०- कंत्राटी सेवा या उद्दीष्टांतर्गत करण्यात यावा.

**४.** या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेला रुपये १७.०० लाख (अक्षरी रूपये सतरा लाख) इतका निधी वितरीत करण्यासाठी सहाय्यक निबंधक (अंदाज व नियोजन) सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून व सह सहकारी निवडणुक आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. निवडणूक प्राधिकरणांतर्गत कंत्राटी सेवा, संगणक खर्च या बाबींकरीता वितरीत करण्यात येणारी रक्कम निवडणूक प्राधिकरण, २०७० ०८८२ अंतर्गत, १०-कंत्राटी सेवा व १७- संगणक खर्च या लेखाशिर्षाखाली खर्ची पडेल.

**५.** सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ.सं.क्र.३०/२०२०/ व्यय-२, दिनांक १८.०१.२०२० अन्वये दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

**६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००३०५११५८५५१९०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chaudhary Anil Jayaram

Digitally signed by Chaudhary Anil Jayaram
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-Operation Marketing and Textile, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f26cf80358fa3133e4d85ddac30ae54b06c63743fd5510dc0ebca082b6c483ce, cn=Chaudhary Anil Jayaram
Date: 2020.03.05 12:00:59 +05'30'

**(अनिल ज. चौधरी)**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. सचिव, राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षण), महाराष्ट्र-१, मुंबई.
४. अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
५. अवर सचिव (१७स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. उप सचिव, व्यय-२ / अर्थ-१३, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

**प्रत :-**

१. मा.प्रधान सचिव (सहकार ), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
२. निवडनस्ती १३-स